महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी अंतर्गत विभागीय कृषि संशोधन केंद्र, शेंडा पार्क, कोल्हापूर गट क्र.६०४ मधील १.१४ हेक्टर जमीन क्षेत्र कृषि विभागास कोल्हापूर येथे कृषि भवन बांधण्याकरिता हस्तांतरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि १४१८/प्र. क्र.१३२/७ अे,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : २९ डिसेंबर, २०१८.**

**वाचा :-** (१) कुलसचिव, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र जा.क्र.प्राधि/कार्यकारी परिषद (३२३)/२२९/२०१८, दिनांक १७/१२/२०१८
(२) महासंचालक, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र क्रमांक मकृप/वि.शि./९७ वी बैठक/२७९९/२०१८, दिनांक २०.१२.२०१८

**प्रस्तावना :-**

महात्मा फुले कृषि विद्यापीठाच्या कार्यकारी परिषदेच्या बैठकीमध्ये विषय क्र. ८, ठराव क्रमांक ०५/का.प.बै.३२३, दि.०६.१२.२०१८ अन्वये राजर्षी शाहु महाराज कृषि महाविद्यालय, कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठ ते संभाजीनगर रस्त्यालगतची स.नं.६०४ मधील १.१४ हे. इतकी जमीन महाराष्ट्र शासनाच्या कृषि विभागाच्या कार्यालयांकरीता प्रशासकीय इमारत बांधणेकामी हस्तांतरीत करण्यास सहमती दर्शविण्यात आली आहे. तसेच महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी दिनांक २३.१०.२०१८ रोजीच्या झालेल्या ९७ व्या बैठकीत (विषय क्र.७) ठराव क्रमांक ५३/९७/२०१८ अन्वये सदर प्रस्तावास मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे.

२. महाराष्ट्र कृषी विद्यापीठे अधिनियम १९८३ मधील कलम ३ (३) च्या परंतुकान्वये कृषी विद्यापीठाकडील स्थावर मालमत्ता भाडे पट्टयाने देणे, तिची विक्री करणे किंवा ती हस्तांतरीत करणे या बाबी राज्य शासनाच्या पूर्वसंमतीने करता येत असल्याबाबतची तरतूद आहे.

**शासन निर्णय :-**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांच्या कार्यकारी परिषदेने तसेच महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी त्यांच्या दिनांक २३.१०.२०१८ रोजीच्या ९७ व्या बैठकीमध्ये घेतलेल्या निर्णयानुसार, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांच्या अधिनस्त असलेल्या सहयोगी अधिष्ठाता, राजर्षी शाहु महाराज कृषि महाविद्यालय, कोल्हापूर येथील शिवाजी विद्यापीठ ते संभाजीनगर रस्त्यालगतची स.नं.६०४ मधील १.१४ हे. इतकी जमीन महाराष्ट्र शासनाच्या कृषि कार्यालयाकरीता प्रशासकीय इमारत बांधणेसाठी हस्तांतरीत करण्यांस मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती..**

१) सदर जमिनीचा वापर ज्या कारणासाठी हस्तांतरीत करण्यात आली आहे त्याच कारणासाठी वापर करावा व सदर जमीन कृषि विभागाने इतरांना हस्तांतरीत करु नये आणि त्रयस्थ पक्षकारांचा कोणताही हितसंबंध, हक्क निर्माण करु नये.

२) या अटींचा भंग केल्याचे निदर्शनास आल्यास सदर जमीन ताब्यात घेण्यास कृषि विद्यापीठास मुभा असेल.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८१२३११११३३१४२६०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Gite Pratap
Venkatrao

Digitally signed by Gite Pratap Venkatrao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and Animal Husbandry, Dairying and Fisheries Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa90705dc27d17e7f5a948e535706ff2c3a1f6c3212fbe679cdac2da9677bb72, serialNumber=707437d6d784d92730d943579bec96a06c8b9d1b0f545fe42541583be9e598cd, cn=Gite Pratap Venkatrao
Date: 2018.12.31 11:40:17 +05'30'

**(प्रताप व्य. गिते)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल-नि-कुलपती यांचे सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा.मंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
५. महासंचालक, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
६. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,
७. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८. विभागीय आयुक्त, पुणे,
९. जिल्हाधिकारी, अहमदनगर / कोल्हापूर,
१०.निवड नस्ती, कार्यासन ७-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.